**महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ (वेतनबँड रुपये १५,६००-३९,१०० + ग्रेड पे रुपये ५,४००) या संवर्गातील वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेत अंशत: बदल.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश, क्रमांकः बदली २०१८/प्र.क्र.४६०/सेवा-३**
१० वा मजला, संकुल इमारत, गो.ते. रुग्णालय, संकुल इमारत,
मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
दिनांक : ०४ डिसेंबर, २०१८

वाचा :-१) शासन आदेश, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः क्र बदली २०१८/प्र.क्र.३७/सेवा-३, दि.३१.०५.२०१८

२) शासन आदेश, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः बदली-२०१८/प्र.क्र.३७७/सेवा ३, दिनांक ११.१०.२०१८.

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ (वेतनश्रेणी रुपये १५,६००-३९,१०० + ग्रेड पे रुपये ५,४००) या संवर्गातील वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या वाचा येथील संदर्भ क्र. १ व २ येथे नमूद शासन आदेशान्वये करण्यात आलेल्या बदली आदेशामध्ये अंशत: बदल करुन खालील विवरणपत्रातील स्तंभ क्र.४ येथे दर्शविलेल्या पदावर सुधारीत पदस्थापना करण्यात येत आहे :

| अ.क्र. | वैद्यकीय अधिकाऱ्याचे नाव | शासन आदेश दि.३१.०५.२०१८, दि.११.१०.२०१८ अन्वये दिलेली पदस्थापना | सुधारीत पदस्थापना |
|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. |
| १ | डॉ रंजना रामसिंग जाधव | प्रादेशिक मनोरुग्णालय नागपूर | आरोग्य व कु क प्र कें नागपूर |
| २ | डॉ तुषार वि पवार | उ जि रु तळोदा जि नंदूरबार | ट्रॉमा केंअर युनिट अहमदपूर जि लातूर |
| ३ | डॉ अंजली पवार (जाधव) | ऑर्थर रोड जेल, मुंबई | जुने जकात घर फोर्ट मुंबई |
| ४ | डॉ जयश्री पुसदेकर | प्रा आ कें शिराळा ता जि अमरावती | संदर्भ सेवा रुग्णालय अमरावती |
| ५ | डॉ महेश जयस्वाल | प्रा आ कें कोनसरी ता चामोर्शी जि गडचिरोली | ता आ अ मोर्शी अमरावती |

| अ.क्र. | वैद्यकीय अधिकाऱ्याचे नाव | शासन आदेश दि.३१.०५.२०१८, दि.११.१०.२०१८ अन्वये दिलेली पदस्थापना | सुधारीत पदस्थापना |
|---|---|---|---|
| ६ | डॉ सुचिता फड | सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग) मुंबई | पोलीस रुग्णालय, नागपाडा मुंबई |
| ७ | डॉ मधुकर का हत्ते | उ जि रु अहेरी जि गडचिरोली | स्त्री रु नांदेड |
| ८ | डॉ सचिन मा यादव | प्रा आ कें पसई ता जि रत्नागिरी | जि रु सातारा |
| ९ | डॉ अंजली म कुलकर्णी | उ जि रु पनवेल जि रायगड | मनोरुग्णालय, येरवडा पुणे |
| | डॉ व्हि के पटणे | उ जि रु डहाणू जि पालघर | उ जि रु पनवेल जि रायगड |
| १० | डॉ नितीन चंद्रकांत बरळ | प्रा आ कें बदलापूर | ता आ अ भिवंडी जि ठाणे |
| ११ | डॉ उमा विजय झाड | पोलीस रुग्णालय सोलापूर | सहायक संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग) सोलापूर |
| १२ | डॉ जयश्री अ घोरपडे | सहायक संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग) सोलापूर | पोलीस रुग्णालय सोलापूर |

१) या आदेशान्वये बदली झालेल्या सर्व वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या बदल्या त्यांच्या विनंतीनुसार करण्यात येत असल्याने त्यांना पदग्रहण अवधी अनुज्ञेय नाही. त्यांना कार्यमुक्त केल्यानंतर त्यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे.

२) बदली करण्यात आलेल्या वैद्यकीय अधिका-यांना त्यांच्या बदली झालेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरीता पर्यवेक्षकीय अधिकाऱ्यांनी शासन आदेशात नमूद उक्त तरतुदीचे तंतोतंत पालन करावे. त्याप्रमाणे कार्यवाही न झाल्यास संबंधित उपसंचालक, जिल्हा शल्यचिकित्सक, जिल्हा आरोग्य अधिकारी, वैद्यकीय अधिक्षक यांना व्यक्तीशः जबाबदार धरण्यात येईल.

३) सदर बदली आदेशामध्ये वैद्यकीय अधिकाऱ्यांची रिक्त पदे भरण्याकरीता दिर्घकाळ गैरहजर असलेल्या तसेच राजीनामा दिलेल्या वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या जागेवर वैद्यकीय अधिकाऱ्यांची बदली दर्शविलेली आहे. सदर वैद्यकीय अधिकाऱ्यांना तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी रुजू करुन घ्यावे व राजीनामा दिलेल्या किंवा दिर्घकाळ अनधिकृत गैरहजर असलेल्या वैद्यकीय अधिकाऱ्यांबाबत आवश्यक तो प्रस्ताव रितसर पध्दतीने संचालक, आरोग्य सेवा यांच्यामार्फत विहीत पध्दतीने सादर करावा.

४) बदली झालेल्या वैद्यकीय अधिकाऱ्यांची कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येऊ नये, अन्यथा रजा मंजूर करणाऱ्या प्राधिकाऱ्यावर जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

५) सदर बदली आदेशामध्ये काही वैद्यकीय अधिकाऱ्यांची दुहेरी पदस्थापना होण्याची शक्यता आहे. त्यासंदर्भात दि.१२.०३.२०१८ चे शासन पत्र क्र. नामनि-२०१७/प्र.क.५३८(भाग-२)/सेवा-३ मधील निदेशानुसार संबंधित उपसंचालकांनी कार्यवाही करावी.

६) बदली झालेल्या वैद्यकीय अधिकाऱ्यांनी कार्यमुक्त केल्यानंतर नविन पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू व्हावे. जे वैद्यकीय अधिकारी पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न होता परस्पर गैरहजर राहतील, अशा अधिकाऱ्यांची अनुपस्थिती **"अनधिकृत गैरहजरी"** म्हणून समजण्यात येईल व पर्यायाने त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता नाकारता येत नाही याची जाणीव सर्व संबंधीतांना करुन देण्यात येत आहे.

७) आरोग्य सेवा संचालनालयाने जे वैद्यकीय अधिकारी त्यांचे पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होणार नाहीत त्यांचे विरुध्द वेळीच कारवाई सुरु करावी. जेणेकरुन वैद्यकीय अधिकारी वेळीच नविन पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होतील. सदर आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून एक आठवड्याच्या आत संबंधीत अधिकाऱ्यांना कार्यमुक्त करण्याची जबाबदारी संबंधित पर्यवेक्षकीय अधिकारी तथा उपसंचालक आरोग्य सेवा (परिमंडळ) यांची राहील.

८) दिर्घकाळ अनिधिकृतपणे गैरहजर असणाऱ्या वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या जागी ज्या वैद्यकीय अधिकाऱ्यांना पदस्थापना देण्यात आली आहे, त्यांना रुजू करुन घ्यावे व दिर्घकाळ अनधिकृत गैरहजर असणाऱ्या वैद्यकीय अधिकाऱ्यांविरुध्द म. ना. से. (शिस्त व अपिल), नियम १९७९ नुसार तात्काळ कार्यवाही सुरु करावी. अनधिकृत गैरहजर वैद्यकीय अधिकाऱ्यांच्याबाबतीत त्यांचे प्रकरणपरत्वे स्वतंत्र आदेश निर्गमित करण्यात येतील.

९) सदर आदेश महाराष्ट्र कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) ४ (५) मधील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२०११८२४२१३७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Varsha Munjaji Bharose

Digitally signed by Varsha Munjaji Bharose
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f3096a175796cc670522c4aff97da20b708981b5122e87c8346c4cc7468f821, serialNumber=1bd844032884bbf2167bc99cd85325223aceef69d02bd455b7ca6972491623e0, cn=Varsha Munjaji Bharose
Date: 2018.12.04 11:44:07 +05'30'

**(व.मुं.भरोसे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

संबंधित वैद्यकीय अधिकारी गट-अ (यांना संबंधित उपसंचालक, आरोग्य सेवा यांच्या मार्फत)

**प्रत,**

१) आयुक्त आरोग्य सेवा, मुंबई.
२) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर.
३) संचालक आरोग्य सेवा, मुंबई.
४) उपसंचालक आरोग्य सेवा, सर्व परिमंडळे.
५) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक.

६) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद.
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
९) निवडनस्ती (सेवा-३)